

NEHRU
BAL PUSTAKALAYA

# ईदगाह

## प्रेमचंद

अनुवाद
संजीवनी खेर

सजावट
पी. बी. काबडी

# ईदगाह

प्रेमचंद

अनुवाद
संजीवनी खेर

सजावट
पी. बी. कावडी





ISBN 81-237-0599-9

पहिली आवृत्ती 1982 (*शके* 1904)
चौथी आवृत्ती 1990 (*शके* 1912)
पाचवी आवृत्ती 1991 (*शके* 1914)
सहावी आवृत्ती 1992 (*शके* 1914)
सातवी आवृत्ती 1993 (*शके* 1916)
आठवी आवृत्ती 2002 (*शके* 1923)



Idgah *(Marathi)*

**रु. 11.00**

संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया, ए-5 ग्रीन पार्क
नवी दिल्ली-110 016 यांनी प्रकाशित केले.

# ईदगाह

रमजानच्या तीस दिवसांच्या रोज्यांनंतर[1] आज ईदचा सण आला आहे. किती रम्य, किती सुंदर सकाळ आहे ही! झाडे हिरवीगार दिसत आहेत. शेतात कशी समृद्धी डोलत आहे. आकाश लालेलाल झालंय. आज सूर्य तर पहा किती सुरेख दिसतोय. किती शांत, किती सुखद! जणू तो साऱ्या जगाला ईदच्या शुभेच्छा देत आहे. गावात नुसती गडबड चालली आहे. ईदगाहला[2] जाण्याची तयारी सुरू आहे. कुणाच्या कुडत्याची बटणं नाहीत, तो शेजाऱ्याकडून सुई दोरा आणायला धावत आहे. कुणाचे जोडे कडक झाले आहेत, त्यांना तेल लावायला, तेल आणायला, तेल्याच्या घरी पळत आहेत, कुणी बैलांना पाणी-बिणी पाजून घेत आहेत ईदगाहमधून परतायला दुपार उलटेल. तीन कोसाचा रस्ता, त्यात शंभरजण भेटतील. त्याना शुभेच्छा देणं, यांत दुपारपर्यंत परतणे कसे शक्य आहे!

मुलं तर खूप आनंदात आहेत, कुणी एक दिवसांचा रोजा पाळलाय व तोही फक्त दुपारपर्यंत, पण कुणी तर तोही पाळलेला नाहीय. पण ईदगाहला जाण्याचा त्यांचा आनंद उतू जातोय. उपासतापास तर मोठ्या माणसांसाठी, म्हाताऱ्यांसाठी असतील पण मुलांसाठी मात्र ईद आहे. रोज ईदच्या नावाचा जप चालला होता, ती ईद आज उगवली आहे. त्यांना घाई झालीय ईदगाहला जाण्याची. ही माणसं लवकर घरातून कां निघत नाहीत? घरच्या चिंतांशी या पोरांचा काय संबंध ? घरात शेवयांच्या खिरीसाठी दूध आहे की नाही याचे त्यांना काय ? त्यांना खीर खायला हवीय बस्स.

त्यांना काय माहित अब्बाजान[3] असे उद्विग्न होऊन चौधरी कायमअलीकडे कां धावले आहेत ! त्यांना काय ठाऊक की आज चौधरींनी मोहरा बदलला, नजर फिरवली तर ईदच्या सणावर पाणी पडेल. ईदचा मोहर्रम[4] होईल.

१. रोजा – मुसलमानांचा धार्मिक उपवास. २. ईदगाह – ईद उत्सव जेथे साजरा होतो ती मसजिद.
३. अब्बाजान – बाबा, वडील. ४. मोहर्रम – दुःखाचा सण.

मुलांच्या खिशात जणू कुबेराचे धन भरले होते. ते पुन्हा आपले पैसे खिशातून काढून मोजत आहेत. पुन्हा खिशात ठेवत आहेत. महमूद मोजतोय – एक, दोन – दहा, बारा. त्याच्याजवळ बारा पैसे आहेत. मोहसीनजवळ एक, दोन, तीन – आठ, नऊ – पंधरा. पंधरा पैसे आहेत. ह्या अगणित पैशानें ते अगणित वस्तु घेणार आहेत. खेळणी, खाऊ, बिगुल, चेंडू व आणखी खूप काही बाही.



सगळयांत जास्त आनंदात आहे हमीद. ४–५ वर्षाचा हा गरीब चेहऱ्याचा, हाड-कुळा मुलगा. याचा बाप मागच्यावर्षीच कॉलऱ्याला बळी गेला आणि आई पांढरी पडत पडत एक दिवस मरून गेली. कुणाला कळलेच नाही तिला काय झाले ते. तिने जरी सांगितले असते की तिला काय होतंय तरी ऐकणारं कोण होतं ? मनावरचे आघात गुपचुप सहन करत राहिली, मनातल्या मनात कुढत राहिली आणि जेव्हां असह्य झालं, तेव्हा हे जग सोडून गेली. आता हमीद आपल्या म्हाताऱ्या अमीना आजीच्या कुशीत निजतो. तिच्याजवळ तो सुखात आहे. त्याचे अब्बाजान पैसे कमवायला गेले आहेत. खूप पिशव्या भरभरून घेऊन ते परत येतील. अम्मीजान[5] अल्लाच्या घरून त्याच्यासाठी खूप छान छान गोष्टी आणायला गेली आहे. म्हणूनच हमीद आनंदात आहे. आशेवर

५. अम्मीजान – आई.



माणूस जगतो. त्यातून ही पोरांची आशा. राईचा पर्वत ते करतात कल्पनेनेच ! हमीद-जवळ जोडे नाहीत. डोक्यावर जुनी पुराणी टोपी आहे. त्याचा वरचा भाग काळा पडला आहे. तरी पण तो .आनंदात आहे. जेव्हा त्याचे अब्बाजान पिशव्या भरभरून वस्तू घेऊन येतील, अम्मीजान मिठाई घेऊन येईल, तेव्हांच तो आपल्या हौशी पुऱ्या करणार आहे. तेव्हा पाहू मोहसिन, महमूद, नूरे आणि सम्मी इतके पैसे कुठून आणतील !

इकडे बिचाऱ्या अमीना आजीला वाईट वाटंतग. आबीद असता, तर ईद अशी साजरी झाली असती. आज तर घरात अन्नाचा कण नाही. आणि ईदचा सण आलाय. कुणी बोलवलंय ह्या ईदला इथे ? ह्या घरी तरी तिनं यायला नको होतं ! पण छोटा हमीद ? त्याला कोण जगलंय वाचलंय, यातलं काय कळणार ? त्याच्या मनात व बाहेरही उल्हास आहे, प्रकाश आहे.

हमीद आत जाऊन आजीला म्हणतोय, 'अम्मा तू मुळीच काळजी करू नकोस मी सगळ्यांच्या अगोदर ईदगाहून परत येईन. तू मुळीच घाबरू नकोस.'



अमीनाच्या हृदयात कसेसेच होत आहे. गावातली मुलं आपापल्या वडिलांबरोबर ईदगाहला चालले होते. हमीदला अमीनाशिवाय कोण आहे ? तीच त्याची आईबाप होती. त्याला एकटे कसे पाठवायचे ? त्या गर्दीत पोरगं कुठं हरवलं तर ? नाही, अमीना त्याला असे एकटे पाठवू शकणार नाही. एवढासा जीवं तीन कोस चालेल तरी कसा ? पायाला भेगा नाही का पडणार ? जोडेही नाहीत त्याच्याजवळ ! ती त्याला थोडचा थोडचा अंतराने कडेवर उचलून घेईल ! पण इथे शेवया कोण शिजवेल ? पैसे असते, तर येता येता सगळचा गोष्टी विकत आणल्या असत्या अन् पटापट शिजवल्या असत्या. इथं वस्तूची जुळवाजुळव करायलाच दिवस लागेल. त्या दिवशी फहोमनचे कपडे शिवले होते. त्याचे आठ आणे ईदसाठी वेगळे ठेवले होते, पण गवळीण पैशासाठी अडून बसली. मग काय करणार ? हमीदसाठी काही नाही, तर दोन पैशाचं दूध तर हवं ना ! आता त्या पैशातले फक्त दोन आणे उरले होते. तीन पैसे हमीदच्या खिशात व पाच अमीनाच्या बटव्यांत. एवढेसे धन व हा ईदचा सण ! अल्लाच तारेल आता यातून ! धोबीण, न्हावीण, भंगीण, बांगडचा विकणारी कासारीण सगळचाच येतील. सगळचांनाच शेवया द्यायला हव्यात. कुणाकुणापासून तोंड चुकवणार ? वर्षाकाठी एकदा येणारा सण. अखेर त्यांचे पण नशीब माणसाशी निगडीत आहेच की. पोराला अल्ला दीर्घायुष्य देवो. हेही दिवस जातील.



गावातून सारे चालले होते. मुलांसह हमीदही होता. कधी सगळे धावत. पुढे धावायचे व बरोबरीच्या लोकांची वाट पाहत एखाद्या झाडाखाली उभे राहायचे. ही मोठी माणसं किती हळू चालतात ! हमीदच्या पायांना जणू पंखच फुटले होते. तो मुळी थकतच नव्हता. सर्वजण शहराच्या वेशीजवळ आले. रस्त्याच्या दुतर्फा श्रीमंताचे बंगले होते. पक्की घरे होती. झाडावर आंबे व लिची[६] लागलेल्या होत्या. चालता चालता कुणी एखादा पोरगा झाडांच्या दिशेने दगड फेकतोय. शिव्या देत माळी बाहेर येतोय. पोरं तिथून फर्लांगभर दूर उभी राहून माळ्याला कसं बनवलं म्हणून हसताहेत.

मोठमोठ्या इमारती दिसू लागल्या आहेत. हे न्यायालय आहे, हे कॉलेज, हा क्लब आहे. एवढ्या मोठ्या कॉलेजात किती बरं मुलं शिकत असतील ? सगळी काही मुलं नाहीत. काही तर बाप्ये आहेत. मोठे बाप्ये खरंच ! त्यांच्या मोठ्या मोठ्या मिशा पण आहेत. एवढे मोठे झालेत तरी अजून शिकताहेत ! अजून किती शिकणार आहेत आणि एवढं शिकून काय करणार आहेत ? हमीदच्या शाळेत दोन तीन मोठी मुलं आहेत, ती रोज मार खातात पण काम मुळीच करीत नाहीत. अगदी पक्के कामचुकार. इथे पण असेच लोक असणार दुसरे काय ? इथे क्लबमध्ये जादू करतात म्हणे. मोठे मोठे खेळ होतात पण कुणाला आत जाऊ देत नाहीत. संध्याकाळी इथे साहेबलोक खेळतात. मोठी माणसं खुशाल खेळतात ! त्यांच्या मडमाही खेळतात म्हणे ! आमच्या अम्माला ते काय म्हणतात —बॅट ! हं ती तर हातातही धरू शकणार नाही. फिरवायला सांगाल तर झेलपाटत जाईल.

महमूद म्हणाला, 'माझ्या अम्मीजानचे तर हातच कापायला लागतील. अल्लाची शपथ'!

मोहसिन म्हणाला, 'अम्मी मणभर पीठ दळेल. पण जरा बॅट धर म्हटलं, तर हात थरथरायला लागेल. शेकडो कळशा पाणी उपसते रोज ती. पाच कळशा पाणी तर माझी म्हैसच पिऊन टाकते. पण एखाद्या मडमेला सांगा बघू. एक कळशी पाणी भरायला, घेरी येईल तिला.'

महमूद म्हणाला, 'पण अम्मी उड्या मारू शकत नाही, धावू शकत नाही.'

मोहसिन उत्तरला, 'हो, उड्या मारू शकत नाही. पण त्या दिवशी माझी गाय दावं सोडून पळाली व चौधरीच्या शेतात घुसली तेव्हा अम्मा इतक्या वेगाने धावत

६. लिची – एक प्रकारचे जांभळाएवढे फळ. टरफल खडबडीत पण रसदार गर.

होती की मी पण तिच्या बरोबरीने धाऊ शकलो नाही. खरं सांगतोय.'

पुढे चालले तर हलवायांची दुकाने लागली. किती सुंदर रचून, सजवून ठेवली होती मिठाई. एवढी मिठाई कोण खात असेल ? पहा, तर एकेका दुकानात मणांनी मिठाई ठेवली आहे. असं म्हणतात की रात्री भुतं येऊन सगळी मिठाई खरेदी करतात. अब्बा म्हणतात–रात्री–मध्यरात्री एक माणूस प्रत्येक दुकानात जातो आणि जेवढा माल उरला सुरला असेल वजन करून घेतो. आणि त्यांना खरेखुरे पैसे देतो. अगदी ह्या पैशांसारखे पैसे ! हमीदला खरं वाटेना. असले रुपये भुताजवळ कुठून येतील ?

मोहसिन म्हणाला,'भुतांना काय कशाचा तुटवडा ? ज्या खजिन्यांत वाटले तिथे चालले–गेले. लोखंडी दरवाजाही त्यांना अडवू शकत नाही. आहेस कुठे तू ? हिरे जवाहिरसुद्धा असतात त्यांच्याजवळ ! ज्यांच्यावर त्यांची मर्जी जाईल, त्याला टोपल्या भरभरून जवाहीर देऊन टाकतील. आत्ता इथे असले तर पाच मिनिटात कलकत्त्याला पोहचतील.'



हमीदने पुन्हा विचारले,'ही भुतं खूप मोठमोठी आकारानं प्रचंड असतात का रे !'

मोहसिन म्हणाला, 'अरे एकेक भूत आकाशाएवढं असतं. जमिनीवर उभं राहिलं, तर डोक आकाशाला लागतं. पण मनात आलं, तर एखाद्या छोट्याशा भांड्यातही मावू शकतं ते !'

हमीद-'लोक त्यांना कसे प्रसन्न करीत असतील ? मला पण एखादा मंत्र सांग, ज्याने मी भुताला प्रसन्न करून घेईन.'

मोहसिन-'ते तर मलाही ठाऊक नाही रे. पण म्हणतात की चौधरीसाहेबांना भुतं वश आहेत. काही चोरीला गेले, तरी चौधरीसाहेब त्याचा शोध लावतील. चोराचे नावही सांगतील. जुम्मेरातीचे बछडे एकदा हरवले होते. तीन दिवस सगळे कासावीस होते. कुठंही सापडलं नाही. शेवटी झक मारत नाईलाजाने चौधरीकडे गेले. चौधरींनी लगेच सांगितले की ते बछडे कोंडवाड्यात आहे. आणि ते खरंच तिथं होतं. भुतं येऊन त्यांना सगळ्या बातम्या सांगत असतात.'



आता त्यांच्या ध्यानात आले की चौधरीजवळ एवढा पैसा कसा आला अन् त्यांना मान का आहे ते !

पुढे चालले. ही पोलीस लाईन आहे. इथे सर्व पोलीस कवायती करतात. राईट टर्न. रात्रभर बिचारे येरझाऱ्या घालत पहारा करीत असतात. चोऱ्या न होवोत म्हणून. 'वारे, काय पण अक्कल आहे.' मोहसिन पुढे म्हणाला, 'अरे हा कॉन्स्टेबल काय पहारा करतोय ? तुला काय ठाऊक ? अरे हे चोऱ्या करवतात रे ! शहरात जेवढे चोर डाकू आहेत त्या सगळ्यांशी यांनी हातमिळवणी केलेली आहे. अरे रात्री हे चोरांना म्हणतात, "तुम्ही चोऱ्या करा" व आपण दुसऱ्याच गल्लीत जाऊन "जागे रहा–जागे रहा"चा पुकारा करतात. म्हणूनच तर ह्या लोकांजवळ इतके पैसे झालेत. माझे मामा एका पोलीस ठाण्यावर कॉन्स्टेबल (हवालदार) आहेत वीस रुपये पगार आहे. घरी पन्नास रुपये पाठवतात. अल्लाशपथ, मी त्यांना एकदा विचारले, "इतके पैसे कुठून आले ?" तर हसून म्हणाले, "पोरा, अल्लाने दिले" मग स्वतःच हसून म्हणाले, "आम्ही लोकांनी ठरवले तर लाखो रुपये कमवू शकतो. पण



आम्ही तेवढेच घेतो, ज्यामुळे आपली छि:थू होणार नाही व आपली नोकरी जाणार नाही."'

हमीदने विचारले, 'हे लोक चोरी करवतात मग ह्यांना नाही कुणी पकडत ?' मोहसिनला त्याच्या अज्ञानाची कीव आली. तो म्हणाला, 'अरे वेडया, त्यांना कोण पकडणार ? हेच तर पकडणारे आहेत. पण अल्ला यांना चांगली अद्दल घडवील. हरामाचा पैसा असाच जातो. काही वर्षापूर्वी मामाच्या घराला आग लागली. त्यात त्यांचे सगळे सामानसुमान भस्मसात झाले. एक भांडपण शिल्लक राहिलं नाही. अल्ला-शपथ. कितीतरी दिवस एका झाडाखाली राहिले रे. झाडाखाली ! मग न जाणे कुठून त्यांनी शंभर रुपये कर्जाऊ आणले व भांडीकुंडी घेतली.'

हमीद म्हणाला, 'शंभर म्हणजे पन्नासहून जास्त न रे ?'-- कुठे पन्नास कुठे शंभर ! पन्नास एका पिशवीत मावतील. शंभर दोन पिशव्यातही मावणार नाहीत !'

आता दाट वस्तीचा भाग आला. ईदगाहला जाणाऱ्यांचे गट दिसू लागले. एकाहून एक झुळझुळीत व सुंदर कपडे घातलेले लोक, कुणी एक्क्यात, टांग्यात बसलेले, कुणी मोटारीत बसलेले, सर्वांनी अत्तर लावलेले, सगळ्यांच्याच मनात उत्साह. खेडुतांचा एक गट आपल्या गरिबीचा विचारही मनात न आणता सुखात व आनंदात दंग होऊन चालला होता. मुलांना शहरातल्या सगळ्याच गोष्टी नव्या होत्या. ज्या गोष्टींकडे नजर जाई ते टक लावून पहात बसत. मागून भोंगा वाजला की जागे होत. हमीद तर गाडीखाली येता येता वाचला.



अचानक समोर ईदगाह दिसला. चिंचेची दाट सावली त्यावर पडलेली आहे. खाली पक्की फरशी लावलेली आहे. त्यावर जाजम घातलेले आहे रोजे करणाऱ्यांच्या रांगा लांबच लांब लागलेल्या आहेत. जाजम नसलेल्या भागापर्यंत रांगा गेल्या आहेत. नंतर येणारे मागे रांगेत उभे आहेत. पुढे जागा मुळीच नाही. इथे अल्लाच्या नजरेसमोर सगळे सारखेच आहेत. इथे कुणाचा पैसा वा प्रतिष्ठा पाहिली जात नाही. इथे आलेल्या खेडुतांनीही नियम पाळलेला आहे. मागच्या रांगेत उभे राहिले आहेत.



किती छान व्यवस्था आहे. सगळे एकदम वाकत आहेत, गुढगे टेकत आहेत. किती तरी वेळा ही हालचाल होतीय. जणू विजेचे लाखो दिवे एकदम लागावेत, विझावेत असे दृश्य दिसत आहे.

नमाज संपलाय. लोक परस्परांना मिठी मारून भेटत आहेत. आता सारे मिठाईच्या व खेळण्यांच्या दुकानांवर तुटून पडतील. खेडवळ लोकांचा उत्साहही ह्याबाबत कमी नाही. हा पहा झोपाळा. एक पैसा देऊन यावर बसलात तर घटकेत आकाशात फिरतोय असे वाटेल, तर घटकेत जमिनीवर पडतोय असे वाटेल. हे चक्र आहे. लाकडाचे हत्ती, घोडे, उंट या चक्राला लागलेले आहेत. एक पैसा दिला तर पंचेवीस चकरांची मजा घेता येईल. महमूद, मोहसिन, नूर आणि सम्मी या चक्रातील घोड्यांवर, उंटावर बसत आहेत. हमीद दूर उभा आहे. त्याच्याजवळ तर तीनच पैसे



आहेत. आपल्या भांडवलातील तिसरा भाग जरासे चक्कर वर बसण्यासाठी तो खर्चू इच्छित नाहीय.

सगळे चक्रावरून उतरले आहेत. आता खेळण्यांची खरेदी. दुकानांमध्ये तर तऱ्हेतऱ्हेच्या खेळण्यांच्या राशी पडल्या आहेत. खेळणी तरी किती प्रकारची – राजा, शिपाई, विक्रेते, वकील, भिस्ती, धोबीण व साधू. वा ! किती सुंदर खेळणी आहेत ही ! महमूदने शिपाई घेतलाय. खाकी पोषाख, लाल पगडी, खांद्यावर बंदूक. वाटतंय, जणू अस्सा कवायत करीत येत आहे. मोहसिनने भिस्ती घेतला आहे. ह्या भिस्त्याची



कंबर वाकली आहे. पखाल कमरेवर ठेवली आहे. पखालीचे तोंड एका हाताने धरलेले आहे. किती खूष दिसतोय तो ! जणू गाणं गुणगुणतोय ! बस्स, पखालीतून पाणी उडवायच्या तयारीत आहे. नूरेला वकील आवडतो. चेहऱ्यावर पहा कसे बुद्धीचे तेज आहे. काळा कोट, खाली पांढरी विजार, खिशात घड्याळ, त्याला सोनेरी साखळी, एका हातात कायद्याचे पुस्तक आहे. वाटतंय न्यायालयातून वादविवाद करून आताच बाहेर येतोय. ही सगळी दोन दोन पैशाची खेळणी आहेत. हमीदजवळ एकूण तीन पैसे



आहेत. इतकी महाग खेळणी, तो कशी घेऊ शकेल ? खेळणे हातातून निसटायची खोटी, तुकडे तुकडे होतील त्याचे. जरा पाणी पडले तरी रंग उडेल, धुवून जाईल त्यांचा. असली खेळणी त्याच्या काय कामाची !

मोहसिन म्हणतोय, माझा भिस्ती रोज सकाळ संध्याकाळ पाणी देऊन जाईल.

महमूद – आणि माझा शिपाई घराचा पहारा करील. कुणी चोर आला तर लगेच बंदुकीच्या फैरी झाडेल.

नूर – आणि माझा वकील जोरदार खटले लढवील.

सम्मी – माझी धोबीण रोज कपडे धुवील.

हमीद खेळण्यांची टर उडवू लागला. ' मातीची तर खेळणी आहेत ही. हातातून पडली की चकणाचूर होतील.'

पण त्या खेळण्यांकडे तो एकटक पहात आहे. मनात येतंय, जरा ती खेळणी हातात घेऊन पहावीत. त्याचे हात मुलांकडून खेळणी घेण्यासाठी पुढे सरसावतात. पण मुलं थोडीच खेळणी त्याच्या हाती लागू देणार ! मुलं एवढी उदार असतात का ? आणि विशेषतः नवी स्वतःची खेळणी हाती आल्यावर ? हमीदच्या मनातील इच्छा तळमळत आहे !

खेळण्यानंतर मुलं हलवायांच्या दुकानांकडे वळली आहेत. कुणी रेवड्या घेतल्या आहेत. कुणी गुलाबजाम तर कुणी सोहनहलवा. सगळे मजेत खात आहेत. हमीद या गटापासून आता दूर आहे. बिचाऱ्याजवळ तीन पैसे आहेत ! मग का नाही काही घेऊन खात. हपापल्यासारखा सगळ्यांकडे पहातोय मात्र !

मोहसिन म्हणतोय ' अरे हमीद, रेवड्या घे ना. किती मस्त वास आहे यांना !'

हमीदला शंका आली. किती क्रूर थट्टा आहे ही. मोहसिन काही एवढा उदार-मनाचा नाहीय पण तरी देखील हमीद मोहसिनजवळ जातोय. मोहसिनने द्रोणातून एक रेवडी उचलली. हमीदच्या दिशेने वर हात केला, हमीदने हात पुढे केला. पण मोहसिनने रेवडी आपल्याच तोंडात टाकली. महमुद, नूर व सिम्मीला मजा वाटली हसता हसता त्यांनी टाळ्या पिटल्या. हमीद चिडला.

मोहसिन–बरं, आता मी नक्की देतो तुला रेवडी हमीद, अल्लाशपथ घे न !

हमीद–काही जरूर नाहीय. माझ्याजवळ पैसे नाहीत काय ?

सम्मी–फक्त तीनच पैसे तर आहेत तुझ्याकडे, काय काय घेशील एवढ्यात !

महमूद–माझ्याकडून गुलाबजाम घे रे हमीद. हा मोहसिन बदमाश आहे.

हमीद–मिठाई म्हणजे काय एवढी मोठी गोष्ट आहे. पुस्तकात तर त्याबद्दल वाईटच लिहिलेले आहे.

मोहसिन–माहित आहे, पण मनात तर येत असेल की, मिठाई आता मिळाली तर गट्ट करू. आपले पैसे का नाही काढत तू ?

महमूद–मला माहितंय याची चलाखी. आपले सगळे पैसे खर्च झाले की मग हा आपल्याला चिडवून खाईल.

हलवायांच्या दुकानानंतर काही लोखंडाच्या वस्तुची दुकाने आहेत, काही मुलामा चढवलेल्या व खोट्या दागिन्यांची दुकानेही आहेत. मुलांना या गोष्टीचे मुळीच आकर्षण वाटत नाहीय. सगळेच या दुकानावरून पुढे गेलेत. हमीद एका लोखंडाच्या वस्तूंच्या दुकानापुढे थांबला आहे. तिथे काही चिमटे ठेवलेले आहेत.





त्याच्या मनात विचार आला, आजीजवळ चिमटा नाहीय. तव्यावरून पोळ्या भाजतांना तिचे हात पोळतात. जर आपण चिमटा घेऊन आजीला दिला तर आजीला किती आनंद होईल ? मग तिची बोटें मुळीच भाजणार नाहीत. घरासाठी एक उपयोगी वस्तू तर होईल ! खेळण्यांचा काय उपयोग. पैसे फुकट घालावयाचे नुसते ! थोडा वेळ खेळणी घेतल्याचा आनंद मग कोपऱ्यातच पडणार धूळ खात, मग कुणी बघणार नाही त्यांच्याकडे. नाहीतर घरी पोहचेपर्यंतच तुटून फुटून जातील !

चिमटा किती उपयोगी वस्तू आहे. फुलके तव्यावरून उतरवायला, विस्तवावर फुलके भाजायला उपयोगी आहे हा चिमटा. पुन्हा कोणी विस्तवातले निखारे मागायला आले, तर त्याच चिमटयाने पटापट निखारे उचलून द्यायचे ! बिचाऱ्या आजीला बाजारांत जायला तरी कुठे वेळ असतो ! रोज हात भाजतात तिचे ! हमीदची दोस्त मंडळी पुढे गेली आहेत. सगळे सरबत पीत आहेत.—पहा तर सगळे कसे हावरट आहेत. एवढी मिठाई घेतली. मला एक कणभरही दिली नाही आणि वर म्हणतात माझ्याशी खेळायला ये. माझं एक काम कर. आता मला सांगूच दे कुणी काही काम. मग पहातो. खाऊ देत एकटे मिठाई. तोंडात फोड येतील. चांगली जीभ चुरचुरेल. खायची चटक लागेल, मग

घरून चोरून पैसे घेतील आणि पकडले जाऊन मारही खातील. पुस्तकात खोटं थोडच लिहिलं असेल ! माझे तोंड का खराब करू ? आजी चिमटा पाहून झटकन माझ्या हातून काढून घेईल. म्हणेल 'गुणी पोर माझं ! आजीसाठी चिमटा आणलास तू' असं किती किती कौतुक करील. मग शेजारच्या बायकांना दाखवील. चर्चा होईल सगळ्या गावात हमीदने चिमटा आणला याची. किती चांगला मुलगा आहे. ह्या लोकांनी खेळणी घेतलीत तर यांचे कोणी कौतुक करणार आहे, मोठ्या माणसांचे आशीर्वाद अल्लाच्या दरबारात जातात. अल्ला त्याची दखल घेतो !

माझ्याजवळ पैसे नाहीत म्हणूनच मोहसिन व मेहमूद एवढी मिजास दाखवतात ना मला ? मी पण यांना माझी ऐट दाखवीन. खेळू दे खेळण्याशी व खाऊ देत मिठाया. मी खेळतच नाही खेळणी, तर ह्यांची मिजास का सहन करू ? मी गरीब असेन, पण यांच्याजवळ मागायला तर जात नाही ना ? अब्बाजान कधी ना कधी



येतीलच ना परत ? अम्मा पण येईल परत. मग सांगीन एकेकाला. त्यांनाच विचारीन किती हवीत किती तुम्हाला खेळणी ? एकेकाला टोपल्या भरभरून खेळणी देईन आणि दाखवून देईन त्यांना मित्रांशी कसं वागायचं असतं ते ! यांच्या सारखं नाही की एक पैशाची रेवडी घेतली अन मित्रांना चिडवून चिडवून खायला लागले ! सगळे खूप हंसतील, हमीदने काय आणले तर चिमटा ? हंसतील त्याचे दात दिसतील – त्याने दुकानदाराला विचारले, हा चिमटा केवढ्याचा आहे ?

दुकानदाराने पाहिले की या पोराबरोबर कुणी मोठं नाहीयं तेव्हा तो म्हणाला, 'हे तुझ्या कामाचे नाही.'

'विक्रीसाठी नाहीय का ?'

'विक्रीसाठी कां नाही ? इथवर बोजा आणला असता का ?' 'मग सांगत का नाही किंमत काय पडेल ती ?'

'सहा पैसे लागतील.'

ऐकून हमीदला धक्काच बसला



'नीट, ठीक किंमत सांगा.'

'ठीक पाच पैसे पडतील. हवा तर घ्या नाहीतर जा'.

हमीदने धीर करून विचारले, 'तीन पैशाला द्याल ?'

असं म्हणून तो पुढं सटकला. भाव केला म्हणून उगाचच दुकानदार शिव्या घालायचा ! पण दुकानदाराने शिव्या न देता त्याला हाक मारली. चिमटा दिला. हमीदने चिमटा जणू बंदूक असावी, असा आपल्या खांद्यावर ठेवला होता. अन् मोठ्या आढ्यतेने आपल्या दोस्त मंडळींच्या जवळ आला. आता पहा, ते काय ताशेरे झाडतात ते !

मोहसिन हंसून म्हणाला 'अरे वेड्या, हा चिमटा कशाला आणलास ? काय करणार आहेस ?' हमीद चिमटा जमिनीवर टाकून म्हणाला, 'टाका पाहू तुमची भिस्ती जमिनीवर तुकडे तुकडे होतील त्याचे. समजले !'

महमूद म्हणाला, 'अरे हा चिमटा म्हणजे काय खेळणे आहे ?'

हमीद म्हणाला 'का नाहीय खेळणं ? खांद्यावर ठेवला, झाली बंदूक. हाती घेतला, तर फकीरांचा चिमटा झाला. क्षणात चिपळ्यांसारखा वाजविता येईल. एक चिमटा फिरवला तर तुमच्या खेळण्यांचा चकणाचूर होईल, सगळ्या खेळण्यांची ऐशीतैशी होईल. तुमच्या खेळण्यांनी किती जोर केला, तरी माझ्या चिमट्याचा केस वाकडा करू शकणार नाही. आहे माझा चिमटा एक शूर सिंह ! काय ?'

सम्मीने डफलं घेतलं होतं. हमीदच्या बोलण्याने भारून ती म्हणाली, माझ्या डफल्याच्या बदली देतोस चिमटा ? दोन पैशाचं आहे हे डफलं !

हमीदने डफल्याकडे तुच्छतेने पाहिलं व म्हणाला,'माझा चिमटा तुझ्या डफल्याचं पोट फाडून टाकील. आहेच काय त्यांत ? एका चामड्याच्या तुकड्याचा आवाज नुसता ! जरा पाणी लागलं तरी खलास होईल. माझा दणकट शूर चिमटा आगीत, पाण्यात वादळांत टिकून राहील. सगळ्यांचा सामना करील.'

चिमट्याचा सगळ्यांनाच मोह पडला. पण आता होते कुणाजवळ पैसे शिल्लक ! मेळा पण आता दूर मागे पडला होता. नऊ वाजले होते. ऊन रणरणत होते. सर्वांना घरी पोहचायची घाई झाली होती. आता वडिलांजवळ हट्ट केला तरी चिमटा घेऊन दिला नसता. हमीद भलताच चलाख आहे. आम्हांला चिडवायलाच त्याने आपले पैसे राखून ठेवले होते.

आता मुलांचे दोन गट झाले होते. मोहसिन, महमूद, सम्मी व नूरे एकीकडे व हमीद एकटा एकीकडे.

मोहसिन जीव तोडून म्हणाला – तुझा चिमटा पाणी भरू शकणार नाही !

हमीदने चिमटा नीट सरळ धरून म्हटले, 'अरे तुझ्या भिस्तीला जराही

र ावला, तरी तो धावत येऊन चिमट्याच्या दारी पाणी शिंपू लागेल.'

मोहसिन हारला. पण महमूद त्याच्या मदतीला कुमक घेऊन धावला–'अरे जर कधी पकडला गेलास, तर वकिलाचे पाय धरावे लागतील'

हमीदला या पेचाचे नीट उत्तर सापडले नाही, 'पण आम्हाला पकडेलच कोण ?'

नूरने ताठ्यात म्हटले, 'हा हा बदूकधारी शिपाई' हमीदने त्यांना चिडवत म्हटले. 'हे बिचारे माझ्या शूर रुस्तमे-हिंदला पकडणार ? आणा पाहू. होऊन जाऊ द्या कुस्ती, याच्या चेहऱ्याकडे पाहूनच घाबरून पळतील. हे बिचारे माझ्या चिमट्याला काय पकडतील ?'

मोहसिनला एक नवा मुद्दा सुचला, 'तुझ्या चिमट्याचे तोंड रोज आगीत भाजेल.'

त्याला वाटले, हमीद यावर निरुत्तर होईल पण असे झाले नाही हमीदने ताबडतोब उत्तर दिले, 'आगीत शूरवीरच उड्या घेतात महाशय! तुमचे हे वकील, शिपाई, भिस्ती बायकांसारखे घरात दडतील, आगीत 'उडी घेण्याचे काम रुस्तमे-हिंदच करू शकतो'.

महमूदने खिजवायचा आणखी एक प्रयत्न केला, 'माझे वकील साहेब टेबल-खुर्चीवर बसतील, तुझा चिमटा मात्र स्वयंपाकघरात पडून राहील.

या वाक्याने सम्मी व नूरे पण उत्तेजित झाले. व्वाऽऽ काय बरोब्बर मुद्दा काढलाय आपल्या पठ्ठ्याने! चिमटा स्वयंपाकघरात पडून राहण्याखेरीज काय करणार ?

हमीदला काही समर्पक, योग्य उत्तर देता येईना तो घाईघाईत म्हणाला, 'माझा चिमटा स्वयंपाकघरात पडून राहणार नाही काही! वकीलसाहेब खुर्चीवर बसतील तर तो त्यांना खाली आपटेल!

विजयी माणसाला हारणाऱ्याकडून जो आदर मिळतो तो हमीदलाही आता मिळाला आहे. त्याचे श्रेष्ठत्व सिद्ध झाले होते इतरांनी तीन–तीन, चार-चार आणे खर्च केले, पण एक कामाची वस्तू घेऊ शकले नाहीत. तीन पैशात जमवले सगळे. खरंच आहे नाही तरी खेळण्याचं काय ? तुटून फुटून जातील. हमीदचा चिमटा मात्र वर्षानुवर्षे राहील.

जणू तहाच्या वाटाघाटी सुरू झाल्या असाव्यात अशा सुरात मोहसिन म्हणाला, 'जरा तुझा चिमटा दे तर' पाहू आम्हाला. तू माझा भिस्ती घेऊन बघ.'

महमूद व नूरेने पण आपापली खेळणी पुढे केली.

हमीदची या अटींना मुळीच हरकत नव्हती. सगळयांनी आळीपाळीने चिमटा घेतला व त्यांचीं खेळणी हमीदच्या हाती आली. किती सुंदर खेळणी आहेत ही !

हमीदने ह्या हरणाऱ्यांचे सांत्वन करीत म्हटले, 'अरे मी तुम्हाला चिडवत होतो. हा लोखंडाचा चिमटा ह्या खेळण्यांची काय बरोबरी करणार ? तुमची खेळणी इतकी छान आहेत. वाटतात की 'आता बोलतील.'

पण मोहसिनच्या गटाला हे ऐकून समाधान वाटले नाही. चिमटयाचे महत्त्व त्यांच्या मनावर पक्के बिंबले होते,. चिकटलेले तिकीट आता पाण्याने निघणार नव्हते.

मोहसिन– ही खेळणी पाहून तर आमचे कुणी कौतुक करणार नाही.

महमूद– कौतुकाचं काय म्हणतोस, मार पडला नाही म्हणजे झालं. अम्मा नक्की म्हणणार मेळयातून तुम्ही ही मातीची खेळणी का आणलीत ?

हमीदला हे कबूल करावे लागले की कुणाचीही आई मातीची खेळणी पाहून आनंदित होणार नाही, जितकी चिमटा पाहून आजी आनंदित होईल. तीन पैशातच त्याला सगळे करायचे होते आणि त्या तीन पैशाच्या उपयोगी वस्तूच्या खरेदी-नंतर चुटपुट लागण्याचे काही कारणच नव्हते आणि आता तर चिमटा रुस्तमे-हिंद ठरलाय. सगळया खेळण्यांचा बादशाह !

रस्त्यात महमूदला भूक लागली. त्याच्या वडिलांनी केळी दिली होती खायला. त्याने हमीदलाही त्यातली देऊ केली. इतर मित्र आश्चर्याने पाहातच राहिले. हा चिमटयाचा पराक्रम होता.

सगळया गावात गडबड झाली. मेळयाला गेलेले लोक आले, याची ती गडबड सारी. मोहसिनच्या लहान बहिणीने धावत पुढे येऊन त्याच्या हातून भिस्ती हिसकावून घेतला व आनंदाने जी उडया मारू लागली की हातून भिस्ती खाली पडला व गतप्राण झाला. यावरून भावा-बहिणीत भांडण झाले, मारामारी झाली. दोघेही खूप रडले. ही आरडाओरड ऐकून त्यांची अम्मा दोघांवर चिडली व दोघांना दोन दोन थपडा बसल्या.

मियां नूरेचा वकील तर त्या भिस्तीप्रमाणे जमिनीवर वा तक्यावर बसू शकणार नव्हता. त्याच्या दर्जाप्रमाणे त्याची सोय हवी. भिंतीवर दोन खिळे ठोकले गेले. त्यावर एक फळी टाकली गेली. त्या फळीवर गालिच्याप्रमाणे कागद अंथरला गेला. मग वकीलसाहेब राजा भोजसारखे सिंहासनावर विराजमान झाले. नूरेने

त्याला पंख्याने वारा घालायला सुरुवात केली. न्यायालयात वर खसचे पडदे व विजेचे पंखे असतात. इथे साधा पंखा पण नसावा ? कायद्याच्या बादंगान डोक तापेल की नाही ? बांबूचा पंखा घेतला व नूरेने वारा घालायला सुरुवात केली. इतक्यात माहीत नाही पंख्याच्या वाऱ्याने की धक्क्याने वकीलसाहेब या स्वर्ग-लोकातून खाली पडून मृत्युलोकात गेले त्यांचा मातीचा पोषाख मातीत मिसळला. रडारड झाली. मृत्यूचा शोक करीत वकीलसाहेबांच्या अस्थी धुळीत टाकल्या गेल्या.



आता राहता राहिला महमूदचा शिपाई. त्याला लगोलग गावाचा पहारा करायचे काम दिले गेले होते पोलिस म्हणजे काय तुम्ही सामान्य माणूस समजलात की जो पायी चालेल ? तो तर पालखीत बसणार. म्हणून एक टोपली आणली गेली. त्यात लाल रंगाची काही जुनी कापडे चिंध्या टाकल्या ज्यात शिपाई महोदय आरामात पडू शकतील. नूरेने ही टोपली उचलली व दारात फेऱ्या मारू लागला. त्याचे दोघे भाऊ शिपायाच्या वतीने "छोनेवालो जागो", "उठा झोपणाऱ्यांनो, जागे व्हा" अशा हाका देऊ लागले. महमूदला त्या अंधारात ठेच लागली व शिपाई



महोदय टोपली-बंदुकीसकट खाली आले. त्यांच्या पायाला दुखापत झाली. महमूदला आता जाण आलीय की तो चांगला डॉक्टरही आहे व तुटलेले पाय सहज जोडू शकणार आहे. उपाय आहे उंबराचे दूध. तेही आणले गेले. पाय जोडला गेला, पण शिपायाला उभे केल्याबरोबर पाय पुन्हा वेगळा झाला. शस्त्रक्रिया फोल ठरली. तेव्हा त्याचा दुसरा पाय पण तोडला गेला. म्हणजे कमीत कमी एका जागी बसवता तरी येईल. एका पायाने तो चालू शकणार नाही की उभा राहू शकणार नाही. आता तर हा शिपाई संन्यासी झालाय. आपल्या जागी बसून पहारा देतोय. कधी कधी देवासारखा बनतोय. झालरीचा साफा कुरतडला गेलाय. कधी तर त्याचा वजन म्हणूनही उपयोग केला जातोय.

आता श्रीमान हमीदच्याकडे काय घडतंय पाहू या. अमीनआजी हमीदचा आवाज ऐकून धावत बाहेर आली. त्याला कडेवर उचलून लाड करू लागली, एवढ्यात तिच्या हातात चिमटा आला.

'हा चिमटा कुठे होता ?'

'मी विकत आणलाय'

'किती पैशात ?'

'तीन पैसे दिले'

अमीनाने छाती बडवून घेतली, कसं पोरगं आहे. दुपार झालीय. न काही खाल्लं न प्याला. आणलाय काय तर चिमटा ! 'एवढ्या साऱ्या मेळ्यात तुला आणखी काही मिळालं नाही, तू चिमटा उचलून आणलास तो !'

हमीदने अपराधी आवाजात म्हटले 'तुझे हात तव्याने भाजतात नं म्हणून आणलाय मी चिमटा !'

म्हातारीचा राग लगेच प्रेमात बदलला. दुसऱ्या पोरांनी मिठाई, खेळणी घेतलेली पाहून या पोरालाही वाटलं असेल घ्यावं त्याचं मन किती लोभावलं असेल. एवढा त्याने मनावर ताबा मिळवला कसा ? तिथे पण त्याला ह्या म्हाताऱ्या अमीना आजीची काळजी होती. तिचे मन भरून आले.

आणखी एक मोठी विचित्र गोष्ट झाली होती. हमीदच्या चिमट्याहूनही विचित्र ! पोरगेल्या हमीदने वयस्क हमीदची भूमिका केली होती. म्हातारी अमीना पोरसवदा अमीना झाली होती. ती रडू लागली, पदर पसरून हमीदला आशीर्वाद देत होती व डोळ्यातून मोठे मोठे अश्रू गळत होते.

